**महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेसाठी "सेवानिवृत्त लेखाधिकारी" यांची कंत्राटी तत्वावर नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मुग्रायो-२०१६/प्र.क्र. ५१० (एक)/पंरा-७**
**बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई - ४०० ००१**
**तारीख: ३१ जुलै, २०१७**

**वाचा -**

1) **ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८.१०.२०१५**
2) **सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण २७१५/ प्रक्र १००/१३, दि. १७.१२.२०१६**

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्यातील न जोडलेल्या वाडया-वस्त्या जोडण्यासाठी व ग्रामीण भागातील दुरावस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोनती करण्यासाठी राज्यात मुख्यमंत्री ग्रामसडक योजना दि. २८ ऑक्टोबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी व महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेच्या कामाच्या अंमलबजावणी करीता सेवानिवृत्त लेखाधिकारी यांची कंत्राटी पध्दतीवर तात्पुरती नेमणुक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**आदेश-**

उपरोक्त कार्यवाहीसाठी नेमलेल्या निवड समितीच्या निर्णयानुसार आवश्यक असलेली शैक्षणिक अर्हता, कामाचा अनुभव लक्षात घेता पुढे नावे नमुद केलेल्या सेवानिवृत्त लेखाधिकारी यांची मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी कंत्राटी तत्वावरील लेखाधिकारी म्हणून ते हजर झाल्यापासून ११ महिन्यांच्या कालावधीकरीता करार पध्दतीने नियुक्ती करण्यात येत आहे. संबंधितांनी नेमणुकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

| अ.क्र. | सेवानिवृत्त लेखाधिकारी नाव | नेमणुक केलेले कार्यालयीन ठिकाण |
|---|---|---|
| १ | श्री.रामदास नारायण हिंगमिरे | महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई |

**२. सेवानिवृत्त लेखाधिकारी यांची कंत्राटी पदावरील नियुक्तीच्या कालावधीत कर्तव्ये व जबाबदाऱ्या पुढीलप्रमाणे राहतील.**

१. मुख्यमंत्री / प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेसंबंधातील शासन स्तरावरील लेखाविषयक सर्व बाबी.

२. क्षेत्रिय स्तरावर प्रचलित नियमानुसार/ विहित नमुन्यात लेखे ठेवले जातात किंवा कसे? याबाबत निरिक्षण करुन एकत्रित अहवाल वित्तीय नियंत्रक यांना सादर करणे.

३. म.ग्रा.रस्ते विकास संस्था व वित्तीय नियंत्रक यांनी वेळोवळी दिलेल्या सुचनांच्या अनुषंगाने कामकाज हाताळणे.

४. मुख्यमंत्री / प्रधानमंत्री ग्रामसडक योजना संबंधातील शासन स्तरावरील सर्व रजिस्टर अद्ययावत ठेवणे.

५. मुख्यमंत्री / प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या शासन स्तरावरील सर्व खर्चाचा ताळमेळ घालणे.

६. लेखापरिच्छेद , तारांकित प्रश्न इ. ची उत्तरे त्वरेने तयार करुन शासनास सादर करणे.

७. म.ग्रा.रस्ते विकास संस्थेने वेळोवेळी नेमुन दिलेली कामे करणे, तसेच क्षेत्रीय कार्यालयाकडून माहिती एकत्रित करुननियतकालीन विवरणपत्रे शासनास विहित वेळेत सादर करणे.

८. योजनेचे भौतिक व आर्थिक अहवाल, लेखा विषयक इतर नियतकालीके यांचे संनियंत्रण करणे.

९. शासनाकडुन वेळोवेळी सोपविलेले कामकाज हाताळणे.

१०. वेगवेगळया स्तरावरील बैठकांची माहिती संकलित करणे व सूचनेनुसार बैठकांना उपस्थित राहणे इ.

११. मुख्यमंत्री / प्रधानमंत्री ग्रामसडक योजना व महाराष्ट्र ग्रामीण विकास संस्था यांच्या संबंधीत बाबी

**३.** सेवानिवृत्त लेखाधिकारी यांना उपरोक्त तरतुदीबरोबर सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील पुढील अटी व शर्तीही लागु राहतील.

१. करार पध्दतीने नियुक्ती देण्यात आल्यामुळे संबंधितास शासनाच्या कोणत्याही संवर्गात सेवा समावेशनाबाबत / समावुन घेण्याचे वा नियमित सेवेचे इतर कोणतेही लाभ मिळण्याचा अधिकार / हक्क नसेल.

२. नियुक्तीसाठी सक्षम प्राधिकारी यांना विशेष परिस्थितीत कोणत्याही वेळी अशा अधिकाऱ्यांच्या करार पध्दतीवरील सेवा समाप्त करण्याचे अधिकार राहतील.

३. करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेली व्यक्ती, सोपविलेली सेवा पार पाडण्याच्या कामात व्यत्यय निर्माण होईल, अशा कोणत्याही व्यवसायिक कामात गुंतलेला नसावी.
४. करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तीने गुंतलेले हितसंबंध(conflict of interest) जाहीर करणे आवश्यक राहील.
५. करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींनी त्यांना प्राप्त होणाऱ्या कागदपत्रे/माहिती व आधार सामुग्रीबाबत गोपनीयता पाळणे आवश्यक राहील.
६. करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींनी त्यांच्यावर सोपविलेले कामकाज निश्चित केलेल्या कालावधीत पुर्ण करणे आवश्यक राहील. त्यांच्या कामकाजाबाबत नियुक्ती प्राधिकारी वेळोवेळी आढावा घेऊन कामाचे मुल्यमापन करतील.
७. ज्या सेवानिवृत्त लेखाधिकाऱ्यांची नेमणूक महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई येथे झाली आहे त्यांचे नियंत्रण अधिकारी वित्तीय नियंत्रक (प्र.मं.ग्रा.स.यो. / मु.मं.ग्रा.स.यो.) हे असतील. सेवानिवृत्त लेखाधिकारी यांनी उपरोक्त कामकाजाच्या अनुषंगाने माहिती / प्रस्ताव / अहवाल वेळोवेळी वित्तीय नियंत्रक सादर करावेत.
८. सेवानिवृत्त लेखाधिकारी यांची ११ महिन्याच्या कालावधीकरिता मानधन व अन्य भत्ते / सुविधा सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार निश्चित करण्यात येईल.
९. सेवानिवृत्त लेखाधिकारी यांना देण्यात येणाऱ्या अन्य सुविधा पुढील प्रमाणे असतील.
   अ) क्षेत्रीय दौऱ्याकरिता संबधित क्षेत्रिय कार्यालयाकडील वाहन सुविधा
   ब) अनुज्ञेय दौऱ्याकरीता प्रवासभत्ता व अनुषंगिक खर्च

**४.** या प्रकरणी येणारा खर्च मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे (सीआरसी- ५०५४ ५१५३) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

**५.** हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण २७१५/ प्र.क्र.१००/१३ दि.१७.१२.२०१६ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७३११५२०२९१०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R A Nagargoje

Digitally signed by R A Nagargoje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, cn=R A Nagargoje
Date: 2017.07.31 15:41:06 +05'30'

**(र.आ.नागरगोजे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/( लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई.
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/( लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
३) मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव.
४) मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) कॅम्प ऑफीस, पुणे.
५) अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो) म.ग्रा.र.वि.सं. विभाग (सर्व)
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८) कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो) म.ग्रा.र.वि.सं. जिल्हा (सर्व)
९) राज्य गुणवत्ता समन्वयक, अण्णासाहेब मगर बिल्डिंग, मार्केट यार्ड, गुलटेकडी, गेट नं.२, पुणे-४११००३७.
१०) कक्ष अधिकारी (आस्थापना १) /(रोखशाखा) ग्रा.वि.व ज.सं.वि., मंत्रालय, मुंबई
११) श्री.रामदास नारायण हिंगमिरे, ए-९, सोहम सहकारी गृहनिर्माण संस्था म. जनकल्याण बँकेच्या मागे,महात्मा फुले रोड, पनवेल-४१० २०६.
१२) निवड नस्ती, (कार्यासन पंरा-७) ग्रा.वि.व ज.सं.वि.,बांधकाम भवन, मुंबई.